महाराष्ट्र प्रादेशिक व नगर रचना अधिनियम, १९६६ मधील कलम १५४ अन्वये आदेश

भाडेपट्टयाने दिलेल्या शासकीय भूखंडावर देण्यात येणाऱ्या बांधकाम परवानगीबाबत.

महाराष्ट्र शासन
नगर विकास विभाग,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२,

दिनांक: १५ मार्च, १९९९.

आदेश

क्रमांक:- टीपीबी ४३९८/१८५०/प्र.क्र.२८८/९८/नवि-११

राज्य शासनाद्वारे खाजगी व्यक्तींना/संस्थांना वेळोवेळी शासकीय जमीनी विहित मुदतीसाठी भाडेपट्टयाने अथवा कब्जेहक्काने देण्यात येतात. याबाबतीत जो करारनामा झालेला असतो त्यामध्ये काही अटी व शर्ती समाविष्ट असतात. तसेच भाडेधारकाने या अटी व शर्तींनुसार विवक्षित कालावधीसाठी जमीनीचा वापर विशिष्ट उपयोगासाठी करावयाचा असतो. अशाप्रकारे भाडेपट्टयाने दिलेल्या जमीनीवर बांधकाम करण्यासाठी भाडेपट्टेधारकास नियोजन प्राधिकरणाची बांधकाम परवानगी घेणे आवश्यक असते.

२. तथापि याबाबतील काही प्रकरणी शासनाच्या निदर्शनास आले आहे कि संबंधित नियोजन प्राधिकरणाद्वारे अशाप्रकारच्या शासकीय जमीनीवर बांधकाम परवानगी देतेवेळी करारनाम्यातील अटी व शर्ती यांचे भाडेपट्टेदाराकडून/कब्जेदाराकडून काटेकोरपणे पालन होत नाही. अशीही उदाहरणे नजरेस आलेली आहेत कि भाडेपट्टयाचा कालावधी संपुष्टात आल्यानंतर व त्या भाडेपट्टयाचे नुतनीकरण झालेले नसतांनाही नियोजन प्राधिकरणाद्वारे बांधकाम परवानगी देण्यात आलेली आहे. ही अतिशय गंभीर बाब आहे.

३. तेव्हा भाडेपट्टयाने देण्यात आलेल्या जमीनीवर विकास परवानगी अथवा बांधकाम परवानगी देतेवेळी नियोजन प्राधिकरणाने दक्षता बाळगणे आवश्यक आहे. अशा प्रकरणी महाराष्ट्र प्रादेशिक व नगर रचना अधिनियम.

कलम १५४ मधील तरतुदीनुसार राज्यातील सर्व महानगरपालिका, विशेष नियोजन प्राधिकरणे, नवनगर विकास प्राधिकरणे, नगरपालिका यांना खालीलप्रमाणे आदेश देण्यात येत आहे.

## आदेश

१.

१. शासनाने मंजूर केलेल्या जमिनीची विकास परवानगी व बांधकाम परवानगी देतेवेळी संबंधित करार नाम्यातील अटी व शर्तींचे काटेकोरपणे पालन झाले आहे याची खात्री संबंधीत महसूल अधिकाऱ्याकडून करून घेण्यात यावी.

२. भाडेपट्ट्याची मुदत संपुष्टात आलेली आहे किंवा कसे याची खातरजमा नियोजन प्राधिकरणाने करणे आवश्यक आहे. तसेच कोणत्याही परिस्थितीत ज्या प्रकरणी भाडेपट्ट्याची मुदत संपुष्टात आलेली आहे. त्याप्रकरणी बांधकाम परवानगी/विकास परवानगी संबंधी महसूल अधिकाऱ्याच्या पूर्वपरवानगी-शिवाय देण्यात येवू नये.

हे आदेश महसूल व वन विभागाच्या दि. ३ डिसेंबर ~~ऑक्टोबर~~, ९८ च्या अनौपचारिक संदर्भ सापेक्ष निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या नावाने व आदेशानुसार.

(सही)

[ सु. वि. देशपांडे ]
अवर सचिव

प्रति,

१. सर्व महानगरपालिकेचे आयुक्त
२. सर्व नगरपालिकेचे मुख्याधिकारी,
३. महानगर आयुक्त, एमएमआरडीए, मुंबई
४. मुख्य कार्यकारी अधिकारी, झोपडपट्टी पुनर्वसन प्राधिकरण, मुंबई
५. मुख्य कार्यकारी अधिकारी, एमआयडीसी, मरोळ, अंधेरी [पूर्व], मुंबई
६. मुख्य व्यवस्थापकीय संचालक, सिडको लि, नवी मुंबई
७. मुख्य कार्यकारी अधिकारी, म्हाडा, मुंबई ५१
८. मुख्य कार्यकारी अधिकारी, पिंपरी चिंचवड नवनगर प्राधिकरण पिंपरी, पुणे
९. मुख्य कार्यकारी अधिकारी, ओरोस सिंधुदुर्ग

३. सर्व विभागीय आयुक्त,

४. सर्व जिल्हाधिकारी

५. संचालक, नगरपालिका प्रशासन, मुंबई

६. संचालक, नगर रचना व महाराष्ट्र राज्य, पुणे